**सामाजिक वनीकरणांतर्गत पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड-**
**सन २००९-१० करिता अनुदान वितरणास मंजुरी.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२००९/प्र.क्र. ४७/जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ३० जूलै, २००९**

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र जलसं-१०९२/प्र.क्र.१८२/ जल-७, दि.५.८.१९९२
२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एसएलएफ-२००८/प्र.क्र.३७/जल-१२, दि.१०.४.२००८ व १३.५.२००८
३) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. एसएलएफ २००९/प्र.क्र.३५/जल-१२, दि. २८.४.२००९
४ संचालक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/वा.यो/४०/०८-०९/९२८/०९-१०, दि. २२.६.२००९.
५) वित्त विभाग, परिपत्रक-पूरक-१००९/प्र.क्र१५२/अर्थसंकल्प-३, दि. ३० जून, २००९
६) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. असक-२००९/प्र.क्र. ३२/जल-११, दि. ७.७.२००९

**प्रस्तावना :**

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक / सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड हा कार्यक्रम राज्यात १९९३-९४ पासून राबविण्यात येत आहे. ही योजना सन २००८-०९ मध्ये राबविण्यास संदर्भाधीन दिनांक १० एप्रिल,२००८ व १३ मे, २००८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २००९-१० या आर्थिक वर्षात चालू ठेवण्यासाठी व पहिल्या एप्रिल ते जुलै २००९ या ४ महिन्यांच्या खर्चाकरिता रु. २८.०० लाख इतके अनुदान संदर्भाधीन दिनांक २८ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. आता उर्वरित ८ महिन्यांच्या खर्चाकरिता रु. ९.०० लाख इतक्या अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सदर शासन निर्णयान्वये **"पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक / सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड"** या योजनेसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षातील माहे ऑगस्ट,२००९ ते मार्च,२०१० या ८ महिन्यांकरिता रु.९.०० लाख (रुपये नऊ लाख फक्त) इतके अनुदान मंजूर व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरिता शासनाकडून वितरित झालेल्या निधीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरणपत्रानुसार ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्यामर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर खर्च करण्यात येईल. या अटीच्या अधिन राहून सदर योजनेसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षात प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदरहू कार्यक्रमाची अंमलबजावणी प्रचलित अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यात यावी.

सन २००९-१० या आर्थिक वर्षातील माहे ऑगस्ट,२००९ ते मार्च, २०१० ह्या आठ महिन्यांकरीता या योजनेवर खर्च करण्याकरीता रु. ९.०० लाख इतका निधी ( रुपये नऊ लाख फक्त ) संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास संचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती शासनास पाठविण्यात यावी. राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा तपशील शासनास सादर करावा

४. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- (०४)(०४) पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामुहिक जमिनीवर वृक्ष लागवड (२४०६ २३०१) - ३३ अर्थसहाय्य योजनांतर्गत - दत्तमत**

५. शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अंदाज-१००९/प्र.क्र. १५२/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० जून, २००९ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार आणि प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२००९०७३०१३५३०१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( श्या. र. चौरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
**सर्व सहसंचालक** , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प ३ व ४, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.

-------